गृहनिर्माण विभाग (खुद्द) साठी नवीन
संगणक व प्रिंटर खरेदी करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: खरेदी-२०१८/प्र.क्र.१७८/प्रशा-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २० ऑक्टोबर, २०२०.

वाचा :

१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि.२४ ऑगस्ट, २०१७.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय संकीर्ण-२०१७/प्र.क्र.२०४/उद्योग-४, दि.८ डिसेंबर, २०१७.
३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र .अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३,दि.०२ एप्रिल,२०१८.
४) गृहनिर्माण विभागाचे शासन ज्ञापन क्र. खरेदी-२०१८/प्र.क्र.१७८/प्रशा-१. दि.२४ ऑगस्ट, २०२०.

**प्रस्तावना :-**

गृहनिर्माण विभागातील कार्यालयीन कामकाजासाठी संगणक व प्रिंटर यांची संख्या पुरेशी नसल्याने नवीन संगणक व प्रिंटर खरेदी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सद्य:स्थितीत शासन धोरणानुसार उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण - २०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि.२४ ऑगस्ट, २०१७ नुसार सर्व शासकीय विभागातील वस्तु व सेवांच्या खरेदीसाठी तसेच खरेदी प्रक्रियेच्या कालावधीमध्ये बचत, उत्कृष्ट वस्तुंचा पुरवठा, वाजवी किंमत व संपूर्ण खरेदी प्रक्रियेमध्ये पारदर्शकता आणण्यासाठी केंद्र शासनाच्या राष्ट्रीय खरेदी धोरणांतर्गत विकसित केलेल्या गव्हर्नमेंट-ई-मार्केटप्लेस (GeM) (https://gem.gov.in) या पोर्टलवरुन खरेदी करणे बंधनकारक केले आहे. त्या अनुषंगाने विहीत कार्यपध्दतीनुसार संगणक व प्रिंटर साहित्य खरेदी करण्यात आलेली असून सदरहु खरेदीसाठी झालेल्या खर्चास व प्रदानास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. गृहनिर्माण विभागासाठी १५ संगणक व १० प्रिंटरसह स्कॅनर खरेदी करण्यात आलेले असून सदर खरेदी शासनाच्या प्रचलित धोरणानुसार गव्हर्नमेंट-ई-मार्केटप्लेस (GeM) (https://gem.gov.in) या पोर्टलवरुन खरेदी करण्यात आलेले आहेत. विभागाने खरेदीची रक्कम ही रु. ३.०० लाखांपेक्षा जास्त असल्याकारणाने Online Bidding पध्दतीचा अवलंब करून Online Bidding मध्ये सर्वात कमी दराने पुरवठा करणाऱ्या (Lowest1) PERFECT HOUSE PRIVATE LIMITED, MUMBAI-400 034 व ICON INFOTECH PRIVATE LIMITED, MUMBAI-400 007 या पुरवठादाराकडून संगणक व प्रिंटर साहित्य खरेदी करण्यात आले आहेत. यासाठी झालेल्या **रु.१२,७७,४८५/- (अक्षरी रुपये बारा लाख सत्त्याहत्तर हजार चारशे पंच्याऐंशी फक्त)** इतक्या रक्कमेच्या खर्चास व प्रदानास मंजूरी देण्यात येत आहे. सदर खरेदीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| पुरवठादारांचे नाव | साहित्याचे नांव व वर्णन | देयक क्रमांक/Invoice No. | दिनांक | रक्कम रु. (GST सह) |
|---|---|---|---|---|
| PERFECT HOUSE PRIVATE LIMITED, MUMBAI-400 034. | संगणक संच<br>HP 600 G4 AIO i5 Win 10 Pro 413 ODD (All In One Computer)<br>(१५ नग) | HO/IT/19-20/24 | २१ जानेवारी , २०२० | रु.१०,४२,४८५/- |
| ICON INFOTECH PRIVATE LIMITED, MUMBAI-400 007 | प्रिंटर सह स्कॅनर<br>HP Laserjet Pro M227sdn (Multifunctional Printer)<br>(१०नग) | 113 | २४ जानेवारी, २०२० | रु.२,३५,०००/- |
| | | | **एकुण** | **१२,७७.४८५/-** |

२. प्रस्तुत नवीन संगणक व प्रिंटर यांची खरेदी माहिती व तंत्रज्ञान महामंडळ (माहिती व तंत्रज्ञान विभाग ) यांचेकडून प्राप्त विनिर्देशानुसार (Specification) व मान्यतेने करण्यात आली आहे. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय सीओएम-१००१/प्र.क्र.१७४/०१/३९, दिनांक २९.१०.२००१ व सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक,मातंस-२०११/प्र.क्र.१२५/ ३९, दिनांक २३.०९.२०११ या आदेशांच्या अधीन राहुन व संदर्भ क्र. १ येथील दिनांक २४ ऑगस्ट,२०१७ रोजीच्या उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णयाच्या तरतुदीनुसार खरेदी करण्यात आली आहे. संदर्भ क्र. ३ येथील दि. ०२ एप्रिल, २०१८ रोजीच्या वित्त विभागाच्या परिपत्रकातील परिशिष्ट क्र. ८ येथील बाबींची पूर्तता करून सदर खर्चास मंजुरी देण्यात येत आहे.

३. यावर होणारा खर्च “( मागणी क्र.क्यू-४ ) ३४५१ सचिवालय-आर्थिक सेवा (०९०) सचिवालय (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमजबजावणी ३४५१ २७४६ ( ३१ ),सहायक अनुदाने ( वेतनेतर )” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन तो सन २०२०-२१ या वित्तीय वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर रक्कम आहरीत करून अदा करण्यासाठी अवर सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व उप सचिव, गृहनिर्माण विभाग यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-भाखंस-२०१४/प्र.क्र.८२ भाग III/उद्योग-४, दि.१/१२/२०१६ नुसार खरेदी करण्यात आली असून, शासन निर्णयातील परिच्छेद क्र.४.७ नुसार माल स्वीकारताना घ्यावयाची दक्षता तसेच साठा नोंदवहीत नोंद घेऊन खरेदी करण्यात आलेल्या वस्तूंचा तातडीने विनियोग करण्यात येणार असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.तसेच सदर अनुदानाचा विनियोग केल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात येईल व यापूर्वीचे उपयोगिता प्रमाणपत्र बाकी नसल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

६. सदरहू आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, दिनांक १७/४/२०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ (भाग पहिला) उप विभाग-दोन मधील अनुक्रमांक २७-अ नियम क्र.७६ मधील अट क्र. २ व ३ चे पालन करून विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. याबाबतचे या विभागाचे संदर्भ क्र.४ येथील दिनांक २४ ऑगस्ट, २०२० रोजीचे ज्ञापन अधिक्रमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०२०१६५७३४८६०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pralhad Deobarao Paighan

Digitally signed by Pralhad Deobarao Paighan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9c2217b18b7c156e9724495c8e998808f99e10040e0d7f51f2d444c8281cdfc3, serialNumber=a4ddfb0d095ad8a0140317ceb2a43d821548a7f4f78190b3d7a5a2128a193a1a, cn=Pralhad Deobarao Paighan
Date: 2020.10.23 12:35:09 +05'30'

**( प्र. दे. पायघन )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
४. रोखशाखा, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई. ( मूळ देयकांसह ) (२ प्रती).
५. निवडनस्ती (प्रशा-१).